२०१००९१६१८४३५२००१

**पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण**
मोशी येथील पेठ क्रमांक १४ मधील ६.५७ हेक्टर जागा "जिल्हा न्यायसंकुलासाठी" वाटप करण्यास शासनाच्या मान्यते बाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पीसीएन-३०१०/११६३/प.क्र.३७२/२०१०/नवि-२२
मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
दिनांक: १५ सप्टेंबर, २०१०

**वाचा :** १) प्रमुख जिल्हा न्यायाधिश व सत्र न्यायाधिश, पुणे यांचे पत्र क्रमांक जा.क्र.जन/३५५६/२००९, दिनांक १०.११.२००९

२) मा.मुंबई उच्च न्यायालय जनहित याचिका क्रमांक २६/२००८ मधील दिनांक १४.१०.२००९ चे मा. उच्च न्यायलयाचे आदेश

३) विधी व न्याय विभागाचा अनौ.संदर्भ क्रमांक जमिन/१००९/१०६०/१६०/प्र.क्र.२१/२०१० का.११

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.विप्रा विभाग-१/३८२, दिनांक ८.०३.२०१०

५) विधी व न्याय विभागाचे पत्र क्रमांक जमिन-१००९/१०६०/प्र.क्र.१६०/का.११, दि.२८.५.२०१०

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.विप्रा विभाग-१/१५२९, दिनांक १६.०६.२०१०

७) विधी व न्याय विभागाचे पत्र क्रमांक एमटीजी -२०१०/६०८/(९३)/का.४,दि.४.८.२०१० व त्यासोबतचे मा.मुख्य सचिव यांच्या दालनातील दि.१६ जुन, २०१० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

८) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.विप्रा विभाग-१/१४३२, दिनांक १४.०९.२०१०

९) विधी व न्याय विभागाचे पत्र क्र.एमटीजी-१९०९/९६२/(१५१)/ का.चार दिनांक १४.०९.२०१०

**प्रस्तावना:-**

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या पेठ क्रमांक १४ मधील ६.५७ हेक्टर (सुमारे १५ एकर) क्षेत्र न्याय संकुलासाठी वाटप करण्याची पुणे जिल्हा न्यायालय, पुणे यांनी पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाकडे मागणी केली होती. त्याअनुषंगाने संदर्भाधीन पत्रान्वये सदर जागा जिल्हा न्याय संकुल व न्यायिक अधिकाऱ्यांच्या निवास स्थानासाठी उपलब्ध करुन देण्याबाबत विधी व न्याय विभागाने या विभागास प्रस्ताव सादर केला आहे. या प्रस्तावातील मागणीबाबत संदर्भाधीन पत्रान्वये उपरोक्त जागा प्राधिकरणाचे भुवाटप नियम-१९७३ च्या भाग-३, नियम-५ नुसार पुणे जिल्हा न्यायालय, पुणे यांना "जिल्हा न्याय संकुल आणि न्यायिक अधिकाऱ्यांच्या निवास स्थानासाठी" विषयाधीन जागा वाटप करण्यास शासनाची मान्यता देण्याचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णयः-

मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील मुद्दे, तसेच संदर्भाधीन पत्रातील तपशील व विधी व न्याय विभाग, मंत्रालय यांची मागणी विचारात घेता, पुणे जिल्हा न्यायालयास, "जिल्हा न्याय संकुल व न्यायिक अधिकाऱ्यांच्या निवासस्थानासाठी" पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या पेठ क्रमांक १४ मधील ६.५७ हेक्टर (सुमारे १५ एकर) जागा प्राधिकरणाचे भुवाटप नियम-१९७३ च्या भाग-३, नियम-५ नुसार, सदर जागेच्या भुसंपादन व विकासाचा खर्च व्याजासह वसूल करुन थेट हस्तांतरण (out right transfer) करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर जागेचा ताबा घेण्यानुषंगिक पुढील आवश्यक त्या कार्यवाहीसाठी आपण संबंधित उचित सक्षम प्राधिकारी/अधिकारी यांना प्राधिकृत करुन योग्य ते निर्देश द्यावेत. तसेच विधी व न्याय विभागाने प्राधिकृत केलेल्या सक्षम प्राधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी या आदेशानुषंगिक पुढील आवश्यक ती कार्यवाही नियमानुसार तातडीने पूर्ण करावी.

.०३. सदरील आदेशानुषंगाने मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी सर्व संविधानिक बाबीची पूर्तता करावी

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ सुनिल कोठेकर ]
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.मुख्य सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.सचिव(नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.प्रधान सचिव व विधी परामर्शी यांचे स्वीय सहायक,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) मा.विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे तथा अध्यक्ष, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
६)मा.प्रमुख जिल्हा न्यायाधिश व सत्र न्यायाधिश, पुणे जिल्हा न्यायालय, पुणे
७)मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
८) कक्ष अधिकारी, कार्यासन-११, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) कक्ष अधिकारी, संगणक शाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) निवडनस्ती (नवि-२२), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२

-----------